**शासकीय महाविद्यालये/संस्थामधील रिक्त पदी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने विज्ञापित केलेल्या जाहीरातीच्या अनुषंगाने प्राप्त अर्जांची विद्यापीठ अनुदाने आयोगाच्या अधिसूचनेतील तरतूदींनुसार अर्हता तपासण्यासाठी समिती गठित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.मागणी-२०१५/(४२०/१५)/मशि-१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २२ नोव्हेंबर, २०१६

**वाचा :**
१) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे क्र. १५(१)(१९५)/११७४/,सात-ब दिनांक १०.९.२०१५ रोजीचे पत्र.
२) उच्च व तंत्र विभागाचे क्र. मागणी-२०१५/(४२०/१५)/मशि-१ दिनांक ३०.६.२०१६ रोजीचे पत्र.
३) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची सहयोगी प्राध्यापक व प्राध्यापक या पदाच्या पदभरती बाबतची दिनांक ०१.१०.२०१६ रोजीची जाहीरात.
४) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे क्र. १५(१)(३३)/२४८३/,सत-ब दिनांक १९.१०.२०१६ रोजीचे पत्र.
५) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. उशिसं/२०१६/स.से.प्र./प्रशा-१ दिनांक ११.११.२०१६ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :**

उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील महाविद्यालय/संस्थांमधील सहयोगी प्राध्यापक व प्राध्यापक या संवर्गातील रिक्त पदे भरण्यासाठी सहयोगी प्राध्यापक संवर्गातील ६० पदांसाठी व प्राध्यापक संवर्गातील ४५ पदांसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगास मागणीपत्रे सादर केली असता, सदर मागणीपत्राच्या अनुषंगाने आयोगाने दि. ०६.८.२०१५ रोजी जाहीरात प्रसिध्द केली होती.

सदर जाहीराती वित्त विभागाच्या दि. ०२.६.२०१५ च्या शासन निर्णयानंतर प्रसिध्द केल्यामुळे पदभरतीस वित्त विभागाने आणलेले निर्बंध विचारात घेऊन सर्व पदे भरण्याची कार्यवाही करावी किंवा कसे याबाबत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शासनाचे अभिप्राय अपेक्षिले होते. त्यानुषंगाने विज्ञापित केलेली १००% पदे भरण्यास मान्यता देण्यासाठीचा प्रस्ताव दि. १६.७.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मा. प्रधान सचिव, सा.प्र.वि. यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीसमोर दि. १४.६.२०१६ रोजी ठेवण्यात आला असता, सदर समितीने या विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/संस्थांमधील रिक्त पदांच्या ७५% याप्रमाणे सहयोगी प्राध्यापकांची ४५ पदे व प्राध्यापकांची ३४ पदे भरण्यास मंजूरी दिली आहे.

प्रस्तुत प्रकरणी सहयोगी प्राध्यापक व प्राध्यापक- शासकीय विज्ञान संस्था, मशिसे गट-अ या दोन्ही पदांच्या विज्ञापित जाहीरातीमधील मुद्दा क्र. ४.३ येथे API या शैक्षणिक अर्हतेसंदर्भातील तरतूदी विहीत करण्यात आल्यनुसार अर्जदारांच्या API या शैक्षणिक अर्हतेसंदर्भातील माहिती तज्ञांकडून तपासून घ्यावयाची असल्यामुळे संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली विविध विषयांतील तज्ञांची समिती गठीत करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेली विनंती, विद्यापीठ अनुदान आयोगाच्या दि. ३०.६.२०१० च्या अधिसुचनेतील तरतूदी व संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी कळविलेली विविध विषयांतील तज्ञांची नावे विचारात घेऊन संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली सहयोगी प्राध्यापक व प्राध्यापक या पदांसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे प्राप्त झालेल्या अर्जांमधील विद्यापीठ अनुदान आयोगाच्या अधिसूचनेतील तरतुदी विचारात घेऊन अर्जदार API ची किमान अर्हता धारण करतात किंवा कसे याबाबतची तपासणी करण्यासाठी समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २) श्री. मेंढुळकर विजय दामोदर, प्राध्यापक (वनस्पतीशास्त्र), शासकीय विज्ञान संस्था, मुंबई | सदस्य |
| ३) श्री. सेलबी एन.टी. जोस, सहयोगी प्राध्यापक (गणित), शासकीय विज्ञान संस्था, मुंबई | सदस्य |
| ४) श्रीम. गायत्री मनोहर सकपाळ, सहयोगी प्राध्यापक (रसायनशास्त्र), शासकीय विज्ञान संस्था, मुंबई | सदस्य |
| ५) श्री. चौधरी अजय सुदाम, प्राध्यापक (भौतिकशास्त्र), शासकीय विज्ञान संस्था, मुंबई | सदस्य |
| ६) प्रशासकीय अधिकारी, विभागीय सहसंचालक कार्यालय, उच्च शिक्षण, मुंबई | सदस्य सचिव |

उपरोक्त तज्ञ समितीने उपस्थित राहण्यास्तव ठिकाण, दिनांक व वेळेची सूचना महाराष्ट्र लोकसेवा आयोग त्यांच्या स्वतंत्र ओदशाद्वारे सूचित करेल. सदस्य सचिव यांनी केलेल्या तपासणीचा अहवाल महाराष्ट्र लोकसेवा आयोगास व शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०१६११२३१२३९०८५३०८** असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manisha P Kini

Digitally signed by Manisha P Kini
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=108cbdac08c7e940866a8fc97bfe7f861bf192ce9dd6b4d0924623149a51f9ed, cn=Manisha P Kini
Date: 2016.11.23 12:41:55 +05'30'

**(म.प्र. किणी)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण महाराष्ट्र राज्य, पुणे

२) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, महर्षी कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई-२१

३) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई विभाग, मुंबई

४) संचालक, शासकीय विज्ञान संस्था, मुंबई

५) संबंधित प्राध्यापक व सहयोगी प्राध्यापक यांना संचालक, शासकीय विज्ञान संस्था, मुंबई यांचेमार्फत

६) निवड नस्ती, मशि-१